अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र
विकास प्राधिकरण,नागपूर. यांच्या
अधिपत्याखालील श्री.प्रितीचंद गोंविद बिसेन व
इतर २२ मजूर यांना रुपांतरित अस्थायी
आस्थापनेवर घेण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्र.एसयुटी २०१०/(११०/२०१०)/आ(कामगार)
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक :-२९.११.२०१०

**पहावे** :-अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांचे पत्र
क्र.५७९५/लाविप्रा/आली.७/२०१०, २४.९.२०१०.

**प्रस्तावना:-**

श्री. प्रितीचंद गोंविद बिसेन व इतर २२ अशा एकूण २३ मजूरांना पाणी वाटपाच्या तात्पूरत्या कामाकरिता हंगामी मजूर म्हणून सन १९७६ ते १९९१ या कालावधीत कामावर घेण्यात येऊन काम संपल्यानंतर त्यांना कामावरुन कमी करण्यात आले होते. याबाबत त्यांनी औद्योगिक न्यायालय, भंडारा येथे एकूण १६ याचिका दाखल केल्या होत्या. औद्योगिक न्यायालयाने सदर २३ मजूरांना निकालामध्ये नमूद केलेल्या दिनांकापासून रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घ्यावे असा निर्णय दिला. तसेच ६ मजूरांना अर्ज दाखल केल्याच्या दिनांकापासून थकबाकी द्यावी, १ मजूरास दि. १.४.१९९७ पासून व ४ मजूरांना दि १.१.१९९४ पासून अनुज्ञेय वेतनातील फरक अदा करावा, ४ मजूरांना अनुज्ञेय थकबाकी तक्रार अर्ज दाखल केलेल्या दिनांकापासून द्यावी आणि ८ मजूरांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर आणण्याच्या दिनांकापासून देय वेतनाची थकबाकी देण्याचा निकाल दिला.

शासनाने मा. उच्च न्यायालयामध्ये यासंदर्भात एकूण १६ रिट याचिका दाखल केल्या असता, मा. उच्च न्यायालयाने या सर्व रिट याचिका खारिज करुन ६ मजूरांना औद्योगिक न्यायालयाने दिलेल्या निर्णयाप्रमाणे रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घ्यावे व निवृत्तीवेतन, सेवासातत्य व इतर फायदे द्यावेत, परंतु सदर कामगार मा. औद्योगिक न्यायालयाच्या निकालाच्या दिनांकापर्यंत ( दि १.१.२००५ ) देय वेतनातील फरक मिळण्यास पात्र नसल्याबाबतचे निर्णय दिले, तसेच उर्वरित १७ मजूरांबाबत मा. औद्योगिक न्यायालयाने दिलेल्या निर्णयाची अंमलबाजावणी करण्याचे व थकबाकी देण्याचे निर्णय कायम केले.

शासनाने सदर १६ प्रकरणात दाखल केलेल्या एल.पी.ए सुध्दा,(शासनाने यापूर्वी उच्च न्यायालयात दाखल केलेल्या एल. पी. ए क्र १३५/०६ व त्यामधून निर्माण झालल्या एस एल पी क्र ४४४४/२००९, ( सी. सी ३४/०८) मा. सर्वोच्च न्यायालयाने खारीज केल्याच्या न्यायनिर्णयाच्या आधारे) मा.उच्च न्यायालयाने खारीज केल्या. यासंदर्भात पुढील कार्यवाही करण्याबाबत विधी व न्याय विभागाचे अभिप्राय घेतले असता , विधी व न्याय विभाग,नागपूर यांनी वरील सर्व प्रकरणी, अन्य समान प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयाने गुणवत्ता व विलंब या निकषावर शासनातर्फे दाखल करण्यात आलेली एस. एल. पी. खारीज केलेली असल्याने तसेच संबंधित कामगार हे १००% मागील वेतन सोडून देण्यास तयार असल्यामुळे जलसंपदा विभागाने या आदेशाचे पालन केल्यास शासनाची आर्थिक बचत होऊ शकते या कारणामुळे वरील सर्व १६ प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयात अपिल दाखल न करता मा. न्यायालयाच्या निर्णयांची अंमलबजावणी करावी असे अभिप्राय दिले. त्यानुसार न्यायनिर्णयाची अंमलबजावणी करण्याबाबतचा प्रस्ताव सचिव समितीस दि.१२.११.२०१० च्या बैठकीत सादर करण्यात आला. त्यास सचिव समितीने मान्यता

दिली. सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार सदर २३ मजूरांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांच्या नियंत्रणाखालील कार्यालयांतर्गत सद्य:स्थितीत कार्यरत नसलेल्या २३ मजूरांना सेवेत पुन:स्थापित करण्यास तसेच त्यांच्या नांवासमोर दर्शविलेल्याप्रमाणे त्यांनी धारण केलेले तत्सम पद अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यास खालीलप्रमाणे शासन मंजूरी देत आहे. याबाबतचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

| अ. क्र. | कर्मचा-यांचे नांव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | मा.औ. न्या., भंडारा मधील दावा क्र. | रु.अ.आ. ज्या पदावर आणावयाचे पद व दिनांक | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. प्रितीचंद गोविंद बिसेन | रोजंदारी | मजूर २५.७.१९७९ | २३/१९९५ २१.१०.०४ | मजूर १.१.१९८५ | रु.७५०-९४०(जुनी) २५५०-३२००(५ वेतनआयोग) |
| २ | श्री.श्यालीकराम टिकाराम ठलाल | रोजंदारी | मजूर ,माहे १०/१९८३ | ४२/२००० १५.१.०५ | मजूर १.१.१९९४ | ----------"------- |
| ३ | श्री.केवलराम गणपत ठलाल | रोजंदारी | मजूर ,माहे १०/१९८९ | -----"----- | मजूर १.१.१९९५ | ---------"-------- |
| ४ | श्री.ताराचंद नत्थू ठलाल | रोजंदारी | मजूर ,माहे १०/१९८९ | -----"----- | मजूर १.१.१९९५ | ---------"-------- |
| ५ | श्री.बिसेन सकराम चाचानी | रोजंदारी | मजूर ,माहे १०/१९८९ | -----"----- | मजूर १.१.१९९६ | ---------"-------- |
| ६ | श्री.नागदेव पुवांनी बालपांडे | रोजंदारी | मजूर ,माहे १०/१९९४ | -----"----- | मजूर १.१.१९९९ | ---------"-------- |
| ७ | श्री.राधेश्याम कासीराम पारधी | रोजंदारी | मजूर २२.१२.१९७६ | २४/१९९७ १७.०८.०४ | मजूर ७.१०.१९९४ | ---------"-------- |
| ८ | श्री.नारायण बाजीराव डोंगरे | रोजंदारी | मजूर ०९.२.१९९१ | १८४/१९९७ २०.८.०४ | मजूर १.१.१९९६ | ---------"-------- |
| ९ | श्री.युवराज बोदल गणविर | रोजंदारी | मजूर १.२.१९८९ | १६/१९९५ ३०.६.०४ | मजूर १.२.१९९४ | ---------"-------- |
| १० | श्री.विठोबा मारुती लाडे | रोजंदारी | मजूर १०.०८.१९८१ | २१/१९९५ २१.१०.०४ | मजूर ११.२.१९९९ | ---------"-------- |
| ११ | श्री.गोविंदा नत्थू गोंधळे | रोजंदारी | मजूर १.८.१९८१ | १७/१९९५ ३०.०६.०४ | मजूर १.८.१९८६ | ---------"-------- |
| १२ | श्री रामनाथ केवळराम वालदे | रोजंदारी | मजूर १.८.१९७९ | १९/१९९५ २०.७.०४ | मजूर २३.९.१९९२ | ---------"-------- |
| १३ | श्री.भोजराज सितकुरा उपरीकर | रोजंदारी | मजूर १.४.१९८७ | २२/१९९५ २७.७.०४ | मजूर २.४.१९९२ | ---------"-------- |

| अ. क्र. | कर्मचा-यांचे नांव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | मा.औ. न्या., भंडारा मधील दावा क्र. | रु.अ.आ. ज्या पदावर आणावयाचे पद व दिनांक | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १४ | श्री.अंताराम रामजी फडणवीस | रोजंदारी | मजूर ५.११.१९८६ | २०/१९९५ २७.७.०४ | मजूर ५.११.१९९१ | रु.७५०-९४०(जुनी) २५५०-३२००(-५ वा वेतन आयोग) |
| १५ | श्री.अशोक वातु खोब्रागडे | रोजंदारी | मजूर १.९.१९८८ | १९८/१९९८ २१.१०.०४ | मजूर १.९.१९९३ | ---------"-------- |
| १६ | श्री.फुलकाबाई आबाजी रामटेके | रोजंदारी | मजूर २५.४.१९८८ | १७८/१९९७ ३१.७.०४ | मजूर १.२.१९९८ | ---------"-------- |
| १७ | श्री.त्रेश्वर नारायण वासनीक | रोजंदारी | मजूर २८.३.१९८३ | २३/१९९५ २१.१०.०४ | मजूर १.२.१९९६ | ---------"-------- |
| १८ | श्री.खुशाल कारु कोरे | रोजंदारी | मजूर ३१.७.१९७५ | ४२/१९९४ १७.९.०४ | मजूर १.१.१९८० | ---------"-------- |
| १९ | श्री.गजानन मोनाजी भांडारकर | रोजंदारी | मजूर १.७.१९७५ | -----"----- | मजूर १.१.१९९१ | ---------"-------- |
| २० | श्री.दिनदयाल राजाराम मेंढे | रोजंदारी | मजूर २०.११.१९७४ | -----"----- | मजूर १.१.१९७९ | ---------"-------- |
| २१ | श्री.उरकुडा ताराचंद ठाकरे | रोजंदारी | मजूर ३१.७.१९७४ | -----"----- | मजूर १.१.१९९१ | ---------"-------- |
| २२ | श्री.हरगोंविद शंकर बोरकर | रोजंदारी | मजूर ३०.४.१९८७ | २४/१९९५ २७.७.०४ | मजूर १.५.१९९२ | ---------"-------- |
| २३ | श्री.नागो डोंगरु ऊईके | रोजंदारी | मजूर २.३.१९७८ | १८/१९९५ ३०.६.०४ | मजूर १.१०.१९८६ | ---------"-------- |

२. सदर २३ मजूरांना त्यांनी धारण केलेल्या पदांवर रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत धारण केलेल्या पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांचे बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यात येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

३. अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांनी या आदेशातील सर्व बाबी विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत,याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासननिर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याचे आत निर्गमित करुन ते संबंधित कर्मचा-यांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचा-यांचे नांव,पदनाम ,त्यांचा प्रथम नियुक्तीचा दिनांक व त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे तो दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिका-यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय

अधिका-यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत. तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-याच्या व्यक्तीशः निादर्शनास आणावेत. शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत संबंधित कर्मचा-यांची (नाव,पदनाम,त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्याच्याकडून तशा आशयाचे प्रपत्र "ब" मधील दिलेल्या नमुन्यात हमीपत्र(Undertaking) घेवून ते त्या कर्मचा-यांच्या सेवापटात/सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनानकडे पाठविला जाईल,याबाबत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत/त्रुटी असल्याची संबंधित कर्मचा-यांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचा-यांच्या नेमणुकांच्या आदेशांच्या प्रती,नाममात्र हजेरी पटाच्या प्रती,आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

४. न्यायनिर्णयानुसार सदर २३ मजूरांना थकबाकी देय असली तरी सदर २३ कामगारांनी स्वेच्छेने सर्व थकबाकी सोडून देण्यास तयार असल्याचे हमी पत्र दिले आहे. त्यामुळे सदर २३ मजूरांना रुजू होण्याच्या दिनांकापर्यतची कोणतीही थकबाकी देय असणार नाही. तथापि, त्यांच्या वेतनाची परिगणना त्यांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी.

५. सदर प्रस्तावातील वेतनापोटी होणारा खर्च सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे आदेश,शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्र.एसआरव्ही-१०९७/प्र.क्र.२२/९७/१२, दि.१८.११.१९९७ न्यायालयीन निर्णयासंदर्भात करावयाच्या कार्यवाहीबाबत निर्णय घेण्यासाठी गठीत केलेल्या सचिव समितीने दि.१२.११.२०१० रोजी दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

७. हा शासन निर्णय www.maharashtra.gov.in हया संकेत स्थळावर 20101129200858009 हया संकेत क्रमांकावर प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सहपत्र :- **प्रपत्र- ब**

अ.अ.कोदे

( अ.अ.कोदे)
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :-

वित्त विभाग(व्यय १२), मंत्रालय,मुंबई
सामान्य प्रशासन विभाग(का.१२),मंत्रालय,मुंबई
विधी व न्याय विभाग(ई-शाखा),मंत्रालय,मुंबई
महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता,महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपूर
महालेखापाल,लेखा परिक्षा ,महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपूर
अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी,गोंदिया.
कार्यकारी अभियंता,गोंदिया पाटबंधारे विभाग,गोंदिया
कार्यकारी अभियंता,बाघ इटियाडोह पाटबंधारे विभाग,गोंदिया
आस्थापना(कामगार)संग्रहार्थ.